**लव्ह जिहाद व फसवणूक करून किंवा बलपूर्वक केलेले धर्मांतरण रोखण्याच्या अनुषंगाने कायदेशीर बाबींचा अभ्यास करण्यासाठी विशेष समिती गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र.- एनएएक्स ०७२४/प्र.क्र.२४०/विशा-१ब**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक - १४ फेब्रुवारी, २०२५.

**शासन निर्णय:-**

मा.लोकप्रतिनिधी (आजी/ माजी), राज्यातील विविध संघटना व काही नागरिकांनी लव्ह जिहाद व फसवणूक करून किंवा बलपूर्वक केलेले धर्मांतरण रोखण्यासाठी कायदा करण्याबाबत निवेदने सादर केली होती. भारतातील काही राज्यांकडूनही लव्ह जिहाद व फसवणूक करून किंवा बलपूर्वक केलेले धर्मांतरण रोखण्यासाठी कायदे तयार करण्यात आले आहेत. तदनुषंगाने महाराष्ट्रातील विद्यमान परिस्थितीचा अभ्यास करुन लव्ह जिहाद व फसवणूक करून किंवा बलपूर्वक केलेले धर्मांतरण या अनुषंगाने प्राप्त तक्रारीबाबत उपाययोजना सुचवणे, इतर राज्यातील कायद्याचा अभ्यास करणे व कायद्याचा मसुदा तयार करणे तसेच कायदेशीर बाबींचा अभ्यास करण्यासाठी एक विशेष समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचारधीन होती. त्यानुसार पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली विशेष समिती गठीत करण्यात येत असून सदर समितीची संरचना खालीलप्रमाणे असेल :-

| अ.क्र. | अधिका-याचे पदनाम | समितीतील पदनाम |
|---|---|---|
| ०१ | पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | अध्यक्ष |
| ०२ | अ.मु.स./प्र.स./सचिव, महिला व बालविकास विभाग | सदस्य |
| ०३ | अ.मु.स./प्र.स./सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग | सदस्य |
| ०४ | अ.मु.स./प्र.स./सचिव, विधी व न्याय विभाग | सदस्य |
| ०५ | अ.मु.स./प्र.स./सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | सदस्य |
| ०६ | सह सचिव/उप सचिव (विशा-१ब) गृह विभाग | सदस्य सचिव |
| ०७ | सह सचिव/उप सचिव (विधी) गृह विभाग | सदस्य |

२. सदर समितीची कार्यपद्धती पुढीलप्रमाणे असेल,

महाराष्ट्रातील विद्यमान परिस्थितीचा अभ्यास करुन लव्ह जिहाद व फसवणूक करून किंवा बलपूर्वक केलेले धर्मांतरण या अनुषंगाने प्राप्त तक्रारीबाबत उपाययोजना सुचवणे, कायदेशीर बाबीं तपासणे व इतर राज्यांतील विद्यमान कायद्यांचा अभ्यास करुन कायद्याच्या अनुषंगाने शिफारस करणे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२१४१६४३४४४५२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HEMANT ANANT MAHAJAN

Digitally signed by HEMANT ANANT MAHAJAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=18b72890e049ba3219e993bae40e4fae87fba16fd8c92cbf7f96107d9c100ae1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4146B85AAA58555E80C9D75A2ABA23B993E46DF208B0B469F1B74670DC22D7FA, cn=HEMANT ANANT MAHAJAN
Date: 2025.02.14 16:48:36 +05'30'

**(हेमंत महाजन)**
**उप सचिव, गृह विभाग.**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. उपमुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. राज्यमंत्री, गृह (शहरे) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री, गृह (ग्रामीण) महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मुख्य सचिव, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. अ.मु.स./प्र.स./सचिव, महिला व बालविकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अ.मु.स./प्र.स./सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अ.मु.स./प्र.स./सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अ.मु.स./प्र.स./सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अपर मुख्य सचिव (गृह) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रधान सचिव (विशेष) यांचे स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४. सह सचिव/उप सचिव (विशा-१ब) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. सह सचिव/उप सचिव (विधी) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती (विशा-१ब).